२५१ ते ६०० हे.सिं.क्ष. प्रकल्पांच्या सर्वेक्षण-
अन्वेक्षण कामांसाठी निधीचे वितरण :
जि. रत्नागिरी व सिंधुदुर्ग (उर्वरित महाराष्ट्र विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.सर्वेक्ष-२०२५/प्र.क्र.२७०/जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२५.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे कार्यालयाचे पत्र जा.क्र. प्राजअ/मृवजवि/लेशा-२/**५४५**/२०२५, दिनांक २० मार्च, २०२५.

**प्रस्तावना :** २५१ ते ६०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांच्या सर्वेक्षण-अन्वेक्षणा करिता मागणी क्र.झेडएच-३, लेखाशीर्ष २७०२ ९२२८ खाली सन २०२४-२५ मध्ये रुपये ५.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता सुधारित अंदाजानुसार संदर्भीय परिपत्रकान्वये सद्या उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून संदर्भीय दिनांक २०/०३/२०२५ च्या प्रस्तावामधील सर्वेक्षण कामांचा निधी देण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**निर्णय : रत्नागिरी** जिल्ह्याच्या संगमेश्वर तालुक्यातील **लघुपाटबंधारे योजना सांगवे व सिंधुदुर्ग** जिल्ह्याच्या देवगड तालुक्यातील **लघुपाटबंधारे योजना विठ्ठलादेवी पाटणेवाडी,** कणकवली तालुक्यातील **लघुपाटबंधारे योजना हरकुळ खुर्द दळवीवाडी वडण व हरकुळ बु. मोरजे तलाव** या **०४** प्रकल्पांच्या सर्वेक्षण-अन्वेक्षण कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी एकूण **रुपये १००.९८ लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठ्यान्नव हजार फक्त) एव्हढी** रक्कम वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वरील निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे :

अ) सर्वेक्षण कामांच्या मान्यता, कार्यारंभ आदेश, सर्व्हेक्षण अहवाल, नकाशे, क्षेत्र कार्यवृत्त इ. कागदपत्रे उपलब्ध असल्याची व सर्व कामे नियमानुसार झालेली असल्याची खातरजमा करावी,
ब) अन्वेक्षणासंदर्भातील आवश्यक बाबी (Trial Pit / Core Logging Report) यांची पूर्तता झाली असल्याची देखील खातरजमा करुन घेण्यात यावी,
क) मोजमाप पुस्तिकेतील नोंदी तपासून मागणी केलेली रक्कम वाजवी असल्याची तसेच संबधित कामांना दुबार निधीचे वितरण होत नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी,
ड) मंजूर किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम वितरित करण्यात येवू नयेत,
ई) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर अखर्चित रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.झेडएच-३,
२७०२, लहान पाटबंधारे
८०, सर्वसाधारण
००५, अन्वेक्षण
(०१) सर्वेक्षण
(०१) (०३) २५१ ते ६०० हेक्टर सिंचन क्षमतेपर्यंतच्या पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण (कार्यक्रम) (२७०२ ९२२८)
२७, लहान बांधकामे

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती विहित मार्गाने शासनास सादर कराव्यात.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहिल व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३२७१९१५५८१८२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH
HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f0111
29ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D07
86B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.27 19:16:51 +05'30'

**(रा.हे. बागडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे.
३) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, रत्नागिरी.
४) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
६) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री(मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित मृद व जलसंधारण उपविभागिय अभियंता).
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छ. संभाजीनगर.